**परभणी शहर महानगरपालिकेमध्ये मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या श्री.गौरव देशमुख व श्री.दिपक कानोडे,कंत्राटी अग्निशामक यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - पमपा-२०२०/प्र.क्र.२०९/नवि-२४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ५ मे, २०२२.

**वाचा :-**
१) परभणी महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.१४७,दि.२५.७.२०१८
२) उप आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.कावी-३/आस्था/८९/ २०२०, दि.१५.०५.२०२०
३) आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. कावी-३/आस्था/४३/ २०२२, दि.०१.०२.२०२२
४) शासन निर्णय,नगर विकास विभाग,क्र.नमुंम १२२१/प्र.क्र.७/नवि-२८,दि.२७.७.२०२१

**प्रस्तावना :-**

सन २०११ च्या जनगणेनुसार परभणी शहराची लोकसंख्या तीन लाखापेक्षा जास्त असल्यामुळे परभणी नगर परिषदेचे परभणी शहर महानगरपालिकेत रुपांतरण झाले. परभणी शहर महानगरपालिकेस अग्निशामक (फायरमन) यांची आवश्यकता असल्याने तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांसाठी कंत्राटी तत्वावर/ निश्चित मानधनावर कंत्राटी अग्निशामक भरतीसाठी जाहिरात देऊन अर्ज मागविले होते. अर्ज प्राप्त करुन शैक्षणिक पात्रता तपासून पात्र अग्निशामक यांची महानगरपालिकेने तात्पुरती नियुक्ती केली.

२. परभणी शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने सदर कंत्राटी अग्निशामक (फायरमन) यांना परभणी शहर महानगरपालिकेतील आस्थापनेच्या आकृतीबंधातील रिक्त मंजूर पदांवर शासन नियमानुसार कार्यवाही करुन सामावून घेण्यास ठराव क्र.१४७, दिनांक २५.७.२०१८ रोजी मान्यता दिलेली आहे. सदर प्रकरणांतील अग्निशामक (फायरमन) यांची नियुक्ती विहित मार्गाने झालेली असल्याने सर्वसाधारण सभेचा ठराव क्र.१४७, दिनांक २५.७.२०१८ नुसार त्यांना महानगरपालिकेतील रिक्त पदावर सामावून घेण्याची शिफारस परभणी महानगरपालिकेने त्यांच्या दिनांक १५.५.२०२० च्या पत्रान्वये केली आहे.

३. नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवर विहित प्रक्रिया पार पाडून करार पध्दतीने (कंत्राटी) तात्पुरत्या स्वरुपात वेतनश्रेणी, किमान वेतन व ठोक मानधनावर काम करणाऱ्या

अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या नेमणूका ह्या विहित मार्गाचा (जाहिरात/लेखी परिक्षा/मलाखत) अवलंब करुन झालेल्या असल्याने तसेच सदर कर्मचारी हे त्यांच्या पदासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता व पात्रता धारण करीत असल्यामुळे सदर अधिकारी/कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदावर नियमित समावेशन करण्यास शासन निर्णय दिनांक २७.७.२०२१ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. आयुक्त,परभणी शहर महानगरपालिकेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयाप्रमाणे परभणी शहर महानगरपालिकेतील मानधन तत्वावर कार्यरत असलेल्या कंत्राटी अग्निशामक (फायरमन) यांच्या नियुक्त्या ह्या विहित मार्गाचा (जाहिरात/ लेखी परिक्षा/मुलाखत) अवलंब करुन झालेल्या असल्याने तसेच सदर कर्मचारी हे त्यांच्या पदासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता व पात्रता धारण करीत असल्यामुळे त्यांचे परभणी शहर महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**<u>शासन निर्णय</u>** :-

परभणी शहर महानगरपालिकेच्या संदर्भाधीन दिनांक १५.५.२०२० च्या प्रस्तावात नमूद केलेल्या श्री.गौरव सुरेशराव देशमुख व श्री.दिपक बाबनाजी कानोडे,कंत्राटी अग्निशामक (फायरमन) यांची विहित मार्गाचा अवलंब करुन (जाहिरात/लेखी परिक्षा/मुलाखत) नियुक्ती झालेली असल्याने त्यांचे परभणी शहर महानगरपालिकेच्या आकृतीबंधातील मंजूर व रिक्त पदावर नियमित सामावेशन करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) श्री.गौरव सुरेशराव देशमुख व श्री.दिपक बाबनाजी कानोडे यांचे शासन निर्णयाच्या दिनांकापासून महानगरपालिकेच्या सेवेत समावेशन करण्यात यावे.

२) समावेशन झालेल्या कर्मचाऱ्यांची नियमित सेवा सर्व प्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी.

३) नियमित सेवेच्या दिनांकापासून त्यांना सेवा जेष्ठता, निवृत्ती वेतन इ.चे लाभ अनुज्ञेय राहतील.

४) समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवाकालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

५) समावेशन करण्यापूर्वी संबंधित कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेवून त्यामध्ये मागील सेवाविषयक कोणताही लाभ मिळणार नाही. तसेच भविष्यात याबाबत मागणी करता येणार नाही. याचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६) सदर कर्मचाऱ्यांच्या नियमित समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता कोणताही निधी शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

(७) परभणी शहर महानगरपालिकेमार्फत उत्पन्नवाढीच्या उपाययोजना करण्यात याव्यात.

२. उक्त शासन निर्णयाप्रमाणे या प्रकरणी त्वरीत कार्यवाही करुन अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र. २०२२०५०५११३४४१६४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.05.05 11:45:24 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.
२. महापौर,परभणी शहर महानगरपालिका, परभणी.
३. आयुक्त, परभणी शहर महानगरपालिका, परभणी.
४. अपर मुख्य सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. उप आयुक्त (प्रशासन),परभणी शहर महानगरपालिका,परभणी.
६. निवड नस्ती (नवि-२४)